**खेड, जिल्हा रत्नागिरी येथील दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर खेड यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीडीओ २०१८/प्र.क्र.१५३/का.११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. ०३ ऑक्टोबर, २०१८

वाचा:-

१) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक:- सीआरसी ०४१७/ ३१८/ प्र.क्र.१३५/ का-११, दि.०९ मे,२०१८
२) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक:- सीआरसी ०४१७/३१८/प्र.क्र.१३५/ का-११, दि.०९ ऑगस्ट,२०१८
३) शासन अधिसूचना विधि व न्याय विभाग क्रमांक:- सीआरसी ०४१७/३१८/ प्र.क्र.१३५/का-११, दि. ०६ सप्टेंबर,२०१८.
४) उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र No: B(W)A-१२१८/१९९०/२२०९/३४४४१, दि.२१ सप्टेंबर,२०१८.
५) जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांचे पत्र म.जा.क्र.प्रशा.ब-४/४३५१ सन २०१८, दि.१० सप्टेंबर,२०१८.

प्रस्तावना:-

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र.१ येथील दिनांक ०९ मे, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रत्नागिरी जिल्हयातील खेड येथे दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) हे न्यायालय स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन अ.क्र.२ येथील दिनांक ०९ ऑगस्ट, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर न्यायालयाकरीता आवश्यक खर्चासाठी लागणा-या निधीबाबत मान्यता देण्यात आली आहे. अ.क्र.३ येथील दिनांक ०६ सप्टेंबर, २०१८ रोजीच्या अधिसूचनेनुसार दिनांक ०८ सप्टेंबर, २०१८ पासून दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) खेड हे न्यायालय कार्यान्वित झाले आहे. सबब,संदर्भाधीन अ.क्र.४ व अ.क्र.५ रोजीच्या पत्रान्वये मा.उच्च न्यायालय, मुंबई व जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) खेड जिल्हा रत्नागिरी यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

खेड, जिल्हा रत्नागिरी येथील दिवाणी व न्यायालय (वरिष्ठ स्तर) खेड या न्यायालयासाठी दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) खेड यांना "कार्यालय प्रमुख" तसेच "आहरण

व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

२. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उप विभाग, १ मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार तसेच महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम १५(३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००३१५५९३५५३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: CN = Santosh Sampatti Navagire, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law And Judiciary Department
Date: 2018.10.03 17:23:24 +05'30'

**( सं.सं.नवगिरे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) प्रबंधक (निरीक्षणे- १/२), उच्च न्यायालय, मुंबई.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जि.रत्नागिरी.
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा)महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) खेड,जि.रत्नागिरी.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
६) उप कोषागार अधिकारी,खेड,जि.रत्नागिरी.
७) कक्ष अधिकारी का.७/२३/२४/२५/,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती.